**यवतमाळ पाटबंधारे मंडळ, यवतमाळ अंतर्गत बेंबळा कालवे विभाग, यवतमाळ या विभागातील बेंबळा कालवे उपविभाग क्र.१, थाळेगाव व बेंबळा प्रकल्प पुनर्वसन उपविभाग क्र.६, थाळेगांव हे बांधकाम कार्यप्रकारातील उप विभाग सिंचन व्यवस्थापन कार्यप्रकारात वर्ग करणे बाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : आढावा २०१४/प्र. क्र.१३०/२०१४/आ (प्रशि)**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
तारीख: १४ ऑगस्ट, २०१४.

**वाचा -**

१) शासन निर्णय,वित्त विभाग,क्र.ईआरडब्ल्यू-१०८३/सीआर-६११/८३/एडीएम-९, दि.०८/०३/१९८४.
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.१०९२/सीआर/८०६/व्यय-६, दिनांक १५/१०/१९९२.
३) शासन निर्णय, पाटबंधारे विभाग, क्र.आढावा १००२/३३५/२००२/आ (प्रशि), दि.६/२/२००३.
४) शासन निर्णय, पाटबंधारे विभाग, क्र. एमआयएस-१०९०/६५/९०/आ.(क्षेप्र.), दिनांक १/७/१९९१.
५) शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्र. सीओई-२०१४/३७/(२२/१४)/ मोप्र-२, दि.२८/२/२०१४.

**प्रस्तावना -**

यवतमाळ पाटबंधारे मंडळ, यवतमाळ अंतर्गत सद्य:स्थितीत ३ मोठे, २ मध्यम व १३ लघु प्रकल्प या प्रमाणे एकुण १८ प्रकल्प आहेत. त्यापैकी १५ प्रकल्प बांधकामाधीन असून पूर्णत्वाच्या टप्प्यावर आहेत. तसेच, मोठे, मध्यम व लघु प्रकल्पांवर जून-२०१३ अखेरपर्यंत एकूण ८४,७१० हेक्टर इतकी सिंचन क्षमता निर्माण झालेली आहे. सदर प्रकल्पांवर बांधकामासोबतच सिंचन व्यवस्थापनेची कामेसुध्दा करण्यात येत आहेत. परंतु, विभागाकडे सिंचन व्यवस्थापनाची स्वतंत्र आस्थापना नसल्याने या प्रकल्पासाठी सिंचन व्यवस्थापन विभाग / उपविभाग निर्माण करणे आवश्यक आहे. यानुसार बेंबळा कालवे विभाग, यवतमाळ व बेंबळा प्रकल्प विभाग, यवतमाळ या बांधकाम विभागांच्या अधिनस्त असलेले अनुक्रमे बेंबळा कालवे उपविभाग क्र.१, थाळेगांव व बेंबळा प्रकल्प पुनर्वसन उपविभाग क्र.६, थाळेगाव हे दोन उप विभाग बेंबळा कालवे विभागाधिन सिंचन व्यवस्थापनाचे उप विभाग म्हणून रुपांतर करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्या अनुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय-**

कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, अमरावतीच्या अंतर्गत यवतमाळ पाटबंधारे मंडळ, यवतमाळ यांच्या कार्यकक्षेत असलेल्या बेंबळा कालवे विभाग, यवतमाळ व बेंबळा प्रकल्प विभाग, यवतमाळ या दोन बांधकाम विभागांतर्गत असलेले अनुक्रमे बेंबळा कालवे उपविभाग क्र.१, थाळेगांव व बेंबळा प्रकल्प पुनर्वसन उपविभाग क्र.६, थाळेगांव या दोन उपविभागांस सिंचन व्यवस्थापन कार्यालयात रुपांतर करण्यास याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त रुपांतरणामुळे यवतमाळ पाटबंधारे मंडळ, यवतमाळ या मंडळांतर्गत असलेल्या ७ विभागांपैकी ६ विभाग पूर्वीप्रमाणेच त्यांच्या उपविभागांसह कार्यरत राहतील व बेंबळा कालवे विभाग, यवतमाळ, हा विभाग आता बेंबळा प्रकल्प सिंचन व्यवस्थापन उपविभाग क्र.१ कळंब, ता. कळंब, जि.यवतमाळ व बेंबळा प्रकल्प सिंचन व्यवस्थापन उपविभाग क्र.२ राळेगाव, ता.राळेगाव, जि.यवतमाळ हे दोन सिंचन व्यवस्थापन उपविभाग, नव्याने निर्माण होणाऱ्या आठ शाखा तसेच अस्तित्वातील ३ बांधकाम कार्यप्रकारातील उप विभाग कार्यालयांसह कार्यरत राहतील. मंडळ कार्यालयांतर्गत विभाग/उपविभाग/ शाखांची रचना सोबतच्या “प्रपत्र-अ” व “प्रपत्र-ब” प्रमाणे राहील.

३. सदर बेंबळा कालवे विभाग, यवतमाळ व त्याअंतर्गत कार्यालयांना खालील अटींच्या अधीन राहून शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

अ. यवतमाळ पाटबंधारे मंडळ, यवतमाळ अंतर्गत बेंबळा कालवे उपविभाग क्र.१, थाळेगांव व बेंबळा प्रकल्प पुनर्वसन उपविभाग क्र.६, थाळेगांव या बांधकाम उपविभागांतर्गतची संपूर्ण आस्थापना मंजूर पदांसह **बेंबळा प्रकल्प सिंचन व्यवस्थापन उपविभाग क्र.१ कळंब, ता. कळंब, जि.यवतमाळ व बेंबळा प्रकल्प सिंचन व्यवस्थापन उपविभाग क्र.२ राळेगाव, ता.राळेगाव, जि.यवतमाळ** या सिंचन व्यवस्थापन उपविभागांकडे वर्ग करण्यात यावी.

आ. **सदर सिंचन व्यवस्थापन उपविभाग व त्या अंतर्गत मंजूर करण्यात आलेल्या शाखा कार्यालयांना आवश्यक असलेली पदे प्रपत्र-ब मधील मूद पदांमधूनच वापरण्यात यावी. सद्य:स्थितीत कोणतीही नवीन पदे निर्माण करण्यात येत नाहीत.**

इ. उपलब्ध रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवरील पदांकडून समकक्ष वेतनश्रेणीतील पदांची कामे अतिरिक्त कार्यभार देवून करुन घेता येतील. उपलब्ध वर्गीकरण झालेली सर्व कार्यालये शासकीय जागेतच ठेवावीत, त्यासाठी बांधकामाचा वेगळ्याने खर्च करु नये.

ई. तसेच सध्याच्या कार्यरत विभाग/उपविभागांतील उपलब्ध साहित्याचाच वापर करण्यात यावा. प्रशासकीय, आस्थापना खर्चात वाढ होणार नाही याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनावर कोणताही आर्थिक भार पडणार नाही.

४. शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक ईआरडब्ल्यू-१०८३/सीआर-६११/८३/एडीएम-९, दिनांक ८ मार्च, १९८४ मधील तरतूदीनुसार नियंत्रण अधिकारी "अधीक्षक अभियंता, अकोला पाटबंधारे मंडळ, अकोला" व आहरण व संवितरण अधिकारी "कार्यकारी अभियंता, बेंबळा कालवे विभाग, यवतमाळ" यांना घोषित करण्यात येत आहे.

५. या प्रकरणी होणारा खर्च मुख्य लेखाशिर्ष "२७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे, ००१ संचालन व प्रशासन, (०४) व्यवस्थापन आस्थापना, (०४)(०१) अधीक्षक अभियंता, अकोला पाटबंधारे मंडळ, अकोला (२७०१ १५८३)" या लेखाशिर्षाखालील मंजूर अनुदानातून भागवावा.

६. उपरोक्त नमूद केलेली कार्यालये अमरावती प्रादेशिक विभागांतर्गत अमरावती विभागामध्ये दिनांक ०१ सप्टेंबर, २०१४ पासून कार्यान्वित होतील या दृष्टीने कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांनी आवश्यक ती सर्व कार्यवाही करुन उपरोक्त कार्यालये दिनांक ०१ सप्टेंबर, २०१४ पासून कार्यान्वित करावीत.

७. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.१०९२/सीआर/८०६/व्यय-६, दिनांक १५/१०/१९९२ मधील तरतूदींनुसार विभागास प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार व आंतर वित्त सल्लागार व सह सचिव यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१४०८१४१६२५५३५८२७ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Subodh Sadashiv Dangle

Digitally signed by Subodh Sadashiv Dangle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Subodh Sadashiv Dangle
Date: 2014.08.14 16:29:25 +05'30'

**(सु. स. डांगळे)**
**शासनाचे अवर सचिव**

**प्रति,**

मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव
मा.मंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव
मा.मंत्री (कृष्णा खोरे) यांचे खाजगी सचिव
मा.मंत्री (खारजमीन) यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक
मा.राज्यमंत्री (लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक
मा.विधानसभा/विधान परिषद सदस्य (सर्व)

प्रधान सचिव (ज.सं.प्र.व विकास), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

प्रधान सचिव (ज.सं.व्य.व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर

महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखा परीक्षा) मुंबई/नागपूर

संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

सर्व कार्यकारी संचालक, महामंडळे / सर्व महासंचालक

सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

सर्व मुख्य अभियंता व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग

अधीक्षक अभियंता, यवतमाळ पाटबंधारे मंडळ, यवतमाळ

अधीक्षक अभियंता, अकोला पाटबंधारे मंडळ, अकोला.

कार्यकारी अभियंता, बेंबळा कालवे विभाग,यवतमाळ.

सर्व अधिकारी व कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

संगणक कार्यक्रम कक्ष, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई (कार्यालयांच्या स्थलांतरणाबाबत आवश्यक ती नोंद घेण्यास्तव)

कार्यासन आस्थापना (प्रशिक्षण) संग्रहार्थ.

**प्रपत्र-अ**

**बेंबळा कालवे विभाग, यवतमाळ व अंतर्गतच्या कार्यालयांची रचना**

| कार्यालयाचा प्रकार | सध्याचे ( विभाग/उप विभाग ) कार्यालयाचे नाव व कार्यप्रकार | रुपांतरित (विभाग/उपविभाग) कार्यालयाचे नाव व कार्यप्रकार | नवीन सिंचन शाखा कार्यालये | निर्मित सिंचन क्षमता रब्बी समतुल्य (हेक्टरमध्ये) (जून,२०१३ अखेर) |
|---|---|---|---|---|
| **प्रदेश कार्यालय** | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, अमरावती | | | |
| **मंडळ कार्यालय** | यवतमाळ पाटबंधारे मंडळ, यवतमाळ (बांधकाम) | | | |
| **विभाग कार्यालये** | बेंबळा कालवे विभाग, यवतमाळ (बांधकाम) (अंतर्गतचा १ उप विभाग) | बेंबळा कालवे विभाग, यवतमाळ (बांधकाम + **सिंचन व्यवस्थापन**) अंतर्गत | | **एकूण ३१,६८४ हेक्टर** |
| **उप विभाग व शाखा कार्यालये** | **(१) बेंबळा कालवे उप विभाग क्र.१, थाळेगांव, ता. बाभुळगांव, जि.यवतमाळ. (बांधकाम)** | **(१)बेंबळा प्रकल्प सिंचन व्यवस्थापन उपविभाग क्र.१, कळंब, जि.यवतमाळ. (सिंचन)** | १) बेंबळा प्रकल्प सिंचन व्यवस्थापन शाखा क्र.१, बाभूळगांव, ता.बाभूळगांव<br>२) बेंबळा प्रकल्प सिंचन व्यवस्थापन शाखा क्र.२, वेणीकोठा, ता.बाभूळगाव<br>३) बेंबळा प्रकल्प सिंचन व्यवस्थापन शाखा क्र.३, कळंब, ता.कळंब<br>४) बेंबळा प्रकल्प सिंचन व्यवस्थापन शाखा क्र.४, कळंब, ता.कळंब, जि.यवतमाळ | १५,८२९ हेक्टर |
| **विभाग कार्यालय / उप विभाग व शाखा कार्यालये** | बेंबळा प्रकल्प विभाग, यवतमाळ (बांध.) या विभागांतर्गतचा १ उप विभाग<br>**(२) बेंबळा प्रकल्प पुनर्वसन उपविभाग क्र.६, थाळेगांव ता.बाभुळगांव, जि.यवतमाळ. (बांधकाम)** | **(२) बेंबळा प्रकल्प सिंचन व्यवस्थापन उपविभाग क्र.२, राळेगाव, जि. यवतमाळ. (सिंचन)** | १) बेंबळा प्रकल्प सिंचन व्यवस्थापन शाखा क्र.५, राळेगाव, ता.राळेगाव<br>२) बेंबळा प्रकल्प सिंचन व्यवस्थापन शाखा क्र.६, राळेगाव, ता.राळेगाव<br>३) बेंबळा प्रकल्प सिंचन व्यवस्थापन शाखा क्र.७, वाढोणा बाजार, ता.राळेगाव<br>४) बेंबळा प्रकल्प सिंचन व्यवस्थापन शाखा क्र.८, वडकी, ता.राळेगाव | १५,८५५ हेक्टर |
| **अस्तित्वातील बांधकाम कार्यप्रकारातील उप विभाग** | (३)बेंबळा कालवे उप विभाग क्र.२,यवतमाळ (बांधकाम) | (३)बेंबळा कालवे उप विभाग क्र.२,यवतमाळ (बांधकाम) | ---- | ---- |
| | (४)बेंबळा कालवे उप विभाग क्र.३,कळंब (बांधकाम) | (४)बेंबळा कालवे उप विभाग क्र.३,कळंब (बांधकाम) | ---- | ---- |
| | (५)बेंबळा कालवे उप विभाग क्र.४,राळेगांव (बांधकाम) | (५)बेंबळा कालवे उप विभाग क्र.४,राळेगांव (बांधकाम) | ---- | ---- |

Subodh Sadashiv Dangle

Digitally signed by Subodh Sadashiv Dangle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Subodh Sadashiv Dangle
Date: 2014.08.14 16:30:00 +05'30'

( सु. स. डांगळे)
शासनाचे अवर सचिव

**प्रपत्र - ब**

**यवतमाळ पाटबंधारे मंडळ, यवतमाळ कार्यालयांतर्गतचे बांधकाम कार्यप्रकारातून सिंचन व्यवस्थापन कामासाठी रुपांतरीत उप विभाग कार्यालयांसाठी वर्ग होणारी आस्थापना. (मंजूर पदांचा तपशील.)**

| अ.क्र. | वर्गवार पदाचे नांव | २ उप विभागीय कार्यालयांतील मंजूर पदे |
|---|---|---|
| १ | उप कार्य.अभि./ उप विभागीय अभि./ अधिकारी | २ |
| २ | सहायक अभि.-२/ शाखा अभि./ कनिष्ठ अभि. | ८ |
| ३ | अनुरेखक | २ |
| ४ | स्थापत्य अभि. सहायक | ८ |
| ५ | वरिष्ठ लिपिक | २ |
| ६ | कनिष्ठ लिपिक | ४ |
| ७ | टंकलेखक | २ |
| ८ | वाहनचालक | २ |
| ९ | शिपाई | ४ |
| १० | चौकीदार | २ |
| | **एकूण :-** | **३६** |

Subodh Sadashiv Dangle

Digitally signed by Subodh Sadashiv Dangle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Subodh Sadashiv Dangle
Date: 2014.08.14 16:30:30 +05'30'

**( सु. स. डांगळे )**
**शासनाचे अवर सचिव**